**कोषागारातून रोख देय अनुदान**

**अर्थसंकल्पीय अनुदान २०१०-११**
**विशेष घटक योजना**
**"२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता "**
प्रधान लेखाशिर्षाखाली अनुसूचीत जाती उपयोजनेअंतर्गत (राज्यक्षेत्र) ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांना अनुदाने
**लेखाशिर्ष (२२१५ १२९१)**

## महाराष्ट्र शासन

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
शासन निर्णय क्र. ग्रापाअ- २०१०/प्र.क्र. २२७ /पापु-१०,
मंत्रालय, मुंबई :- ४०० ०३२.
दिनांक :- २२ मार्च, २०११

संदर्भ १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र अंदाज- २०.१०/सीआर .७१/अर्थकसंकल्प-३ दिनांक १८ मे,२०१०
२) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.ग्रापाअ-१५१०/प्र.क्र.१०७ /पापु-०७, दिनांक २८ एप्रिल,२०१०.
३)शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. ग्रापाअ-१५१०/प्र.क्र.२२७ / पापु-१०, दिनांक २१ सप्टेंबर,२०१०

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.१ अन्वये महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०१० (सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्र.८) म्हणून शासन राजपत्र असाधारण, भाग-८, दिनांक २७ एप्रिल,२०१० यामध्ये प्रसिध्द करण्यात आला आहे.

त्यानुसार, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जाती उपयोजनेखाली नळ पाणी पुरवठा कार्यक्रम (राज्यस्तर) साठी आर्थिक वर्ष २०१०-११ मध्ये एकूण रु. २००.५० लक्ष इतका निधी उपलब्ध आहे.त्यापैकी संदर्भ क्रमांक २ अन्वये रुपये २६.७३ लक्ष व संदर्भ क्रमांक ३ अन्वये रुपये.७३.५२ लक्ष इतका निधी संबंधीतांना वितरीत करण्यात आलेला आहे. आता वित्त विभागाने माहे मार्च २०११ मध्ये रुपये ८०.२० लक्ष रुपये इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी माहे मार्च २०११ मध्ये कॅश-फ्लो नुसार मंजूर व मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

आर्थिक वर्ष २०१०-११ मध्ये विशेष घटक योजनेखाली अनुसूचीत जाती उपयोजनेअंतर्गत नळ पाणी पुरवठा योजनांसाठी (राज्यस्तर) रू. ६८.१७ लक्ष व देखभाल दुरुस्तीसाठी रू. १२.०३ लक्ष या प्रमाणे एकूण **रू.८०.२० लक्ष (रूपये ऐंशी लक्ष वीस हजार फक्त)** इतका निधी शासन, सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना, सोलापूर जिल्ह्यातील नळ पाणी पुरवठा कार्यक्रम राबविण्यासाठी माहे

मार्च, २०११ मध्ये कॅश फ्लोनुसार पुढील अटींवर संगणकीय अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे मंजूर व रोख मुक्त करीत आहे.

(अ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने हे अनुदान चालू आर्थिक वर्षात भारत निर्माण कक्षाने तयार केलेल्या वार्षिक कृती आराखडयातील प्राधान्याने प्रगतीपथावरील नळ पाणी पुरवठा योजनांसाठी खर्च करावयाचे आहे.

(ब) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने या अनुदानातून हाती घेतलेल्या योजनांची यादी या विभागाच्या कार्यासन क्र. पापु-५ व पापु-१० या कार्यासनास पाठविणे आवश्यक आहे.

(क) वरील मंजूर रकमेच्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

(ड) वरील मंजूर अनुदानातून होणाऱ्या खर्चाबाबतची जिल्हानिहाय व प्रत्येक महिन्याची माहिती पुढील महिन्याच्या पाच तारखेपर्यंत प्राधिकरणाने शासनाला कळवावी.

(इ) प्राधिकरणाने वरील कार्यक्रमासाठी केलेल्या खर्चाचे लेखे तपासणीचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर तसेच मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, मुंबई किंवा खास अधिकार दिलेल्या या विभागातील अधिकारी यांना देण्यात येत आहेत.

(ई) मुंबई वित्तीय नियम, १९५९ जोडपत्र-२२ मधील, नियम ३ अनुसार महालेखापाल यांच्या मागणीनुसार

प्राधिकरणाचे लेखे संबंधित कागदपत्रासह निरीक्षणाकरिता प्राधिकरणाने महालेखापाल यांना सादर करावे.

(उ) दि. १.११.१९७९ पासून, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला शासनाकडून जी अनुदाने प्राप्त झाली आहेत किंवा जी अनुदाने पुढे प्राप्त होतील त्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे प्राधिकरणाने द्यावयाची आहेत. त्यात दर्शविलेल्या मंजूर अनुदानाच्या व खर्चाच्या कार्यक्रमनिहाय रकमा प्राधिकरणाच्या वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी यांनी प्रमाणीत करून स्वाक्षरीत कराव्यात व त्या प्रमाणपत्रावर प्राधिकरणाचे सदस्य सचिव यांनी प्रतिस्वाक्षरीत कराव्यात म्हणजे अशी प्रमाणपत्रे या विभागात स्विकारार्ह होतील. या उपयोगिता प्रमाणपत्राच्या प्रती अधिदान व लेखाधिकारी कार्यालयालाही पाठवाव्यात.

२. चालू आर्थिक वर्षी विशेष घटक योजनेअंतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमासाठी राज्यस्तरावरून देखभाल दुरुस्ती निधी वेगळा काढलेला नसल्याने, या शासन निर्णयान्वये देखभाल दुरुस्तीसाठीचा निधी वेगळयाने दर्शविण्यात आलेला आहे. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी देखभाल दुरुस्तीचा निधी आहरीत करून तो कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद सोलापूर यांना धनादेश / धनाकर्षाद्वारे, जिल्हा देखभाल दुरुस्ती निधी मध्ये जमा करण्यासाठी वितरित करावा.

३. वर मुक्त करण्यात आलेला निधी मिळविण्यासाठी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे सदस्य सचिव किंवाप्राधिकरणाचे वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी श्री शं. धे.चव्हाण यांच्या सहीने तयार केलेले व उप सचिव श्री. दु.र.चद्रिकापुरे पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. **सदरहू रक्कम एनईएफटी (NEFT)प्रणालीव्दारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या खाती जमा करण्यात यावी.**

४. शासन परिपत्रक ग्राम विकास विभाग-क्र. आरसीएन-१०८९/सीआर-३०२७/२८, दि. ५.९.९० मधील सूचनांप्रमाणे अनुदानाच्या खर्चाचा, महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ

घालावा व अहवाल विहीत दिनांकांना प्राधिकरणाने या विभागातील कार्यासन क्र.पापु-०५, पापु-२० व पापु-१० कडे सादर करावा.

५. यासठी होणारा खर्च **मागणी क्र. वाय-२, २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता -०१, पाणी पुरवठा-१०२- ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम- अनुसूचित जातीकरिता विशेष घटक योजना- ग्रामीण पिण्याचे पाणी पुरवठा कार्यक्रम- (०२) (०९) नळाद्वारे पाणी पुरवठा (२२१५ १२९१) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर)** या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व त्याखालील मंजूर तरतूदीतून भागवावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. ४९४/०९/अर्थ-१८, दि. ०३ नोव्हेंबर, २००९ अन्वये या विभागास अर्थसंकल्पीत तरतूद वितरीत करण्यास दिलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०३२५१५०४३३०१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

**( फु. स. मेश्राम)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
२. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ ,मुंबई (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
४. संचालक लेखा व कोषागारे, मुं बई
५. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय मुंबई
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
७. वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पापु-०४ व पापु-२०
१०. निवडनस्ती, पापु-१०.